लोकसहभागातून नागरी क्षेत्रातील
वनांचे संरक्षण व व्यवस्थापन करणे.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र.एफडीएम-२०११/प्र.क्र.१००(भाग-२)/फ-२**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ०४ ऑगस्ट, २०१५

**वाचा: -**

१. शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. एसएलएफ १०९१/प्र.क्र.११९/फ-११, दि.१६.३.१९९२
२. शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. एफडीएम १०९३/प्र.क्र.७/फ-२, दि. ८.७.१९९४
३. केंद्र शासनाचे पत्र क्र. २२८/२०००-जेएफएम (एफपीडी), दि. २१.२.२०००
४. केंद्र शासनाचे पत्र क्र.डीओ/२१.१.७/९९/बी-२, दि. ३१.५.२००२
५. शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र.एमएससी/२०००/ प्र.क्र.१४३/ फ-२, दि. २५/०४/२००३
६. शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र.एफडीएम २०११/प्र.क्र.१००/ फ-२, दि.०५/१०/२०११

**प्रस्तावना :-**

वने ही मानवाला मिळालेली अनमोल अशी नैसर्गिक संपत्ती आहे. मानवी जीवन सुसह्य होण्यासाठी दुर्मिळ निसर्ग संपदेचे जतन, संवर्धन, विकास आणि व्यवस्थापन करुन हा ठेवा पुढील पिढ्यांना आपण हस्तांतर करु शकतो. पर्यावरण समतोल व संतुलन साधून विकासाचे प्रकल्प राबविणे हे सद्य:परिस्थितीत आपल्या सर्वांच्या समोरचे मोठे आव्हान आहे. यासाठी स्थानिक लोकांचा सहभाग अभिप्रेत आहे. त्यानुषंगाने केंद्र शासनाच्या पर्यावरण आणि वन मंत्रालयाने सर्व राज्य शासनांना दिनांक १.६.१९९० रोजीच्या मार्गदर्शक तत्वान्वये स्थानिक लोकांच्या सहभागाने वन व्यवस्थापन करण्यासाठी योजना तयार करावी अशी सूचना केली होती. केंद्र शासनाच्या सूचनेचा विचार करून महाराष्ट्र शासनाने लोकांचे सहभागातून वनव्यवस्थापनेबाबत योजना राबविणेचा निर्णय घेतला आहे. त्यानुषंगाने संदर्भ क्र. ५ मध्ये नमूद दि. २५ एप्रिल, २००३ रोजीच्या शासन निर्णयाद्वारे ग्रामिण भागातील वनांचे संरक्षण, संवर्धनासाठी संयुक्त वन व्यवस्थापन समित्या स्थापन करुन त्यांच्या कर्तव्ये आणि जबाबदाऱ्या निश्चित करण्याबाबत सविस्तर सूचना निर्गमित करण्यात आल्या होत्या.

केंद्र शासनाने दिनांक २१.२.२००० व दिनांक ३१.५.२००२ रोजीच्या मार्गदर्शक तत्वान्वये या कार्यक्रमात चांगली वने घेणे आणि स्त्री वर्गाचा जास्त सहभाग प्राप्त करणे इत्यादी बाबत सूचना केल्या आहेत. सदर मार्गदर्शक तत्वांचा सखोल अभ्यास व विचार करून राज्य शासनाने पूर्वी निर्गमित केलेले दिनांक २५.४.२००३ रोजीच्या शासन निर्णयात ग्रामीण भागाबरोबरच शहरी भागात असलेल्या वन जमिनीचे लोकसहभागातून संयुक्त वन व्यवस्थापन करण्याबाबतचे धोरण निश्चित केले होते. तथापि,

संयुक्त वन व्यवस्थापन समितीच्या बळकटीकरणाबाबतच्या दि.५.१०.२०११ रोजीच्या शासन निर्णयामध्ये नागरी क्षेत्रातील वनजमिनीचे लोकसहभागातून वन व्यवस्थापन करण्याबाबतची तरतूद समाविष्ट करण्यात आलेली नाही. वनजमिनीचे अतिक्रमणापासून संरक्षण करणे/ विकास करणे लोकसहभागाशिवाय शक्य नाही. म्हणून नागरी क्षेत्रातील वनक्षेत्राच्या संरक्षणात संयुक्त वन व्यवस्थापन समित्यांचा सहभाग घेण्याबाबत धोरण ठरविण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती. त्यानुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतलेला आहे.

**शासन निर्णय :-**

१. नागरी परिसरात असलेल्या नगरपालिका, नगरपरिषदा आणि महानगरपालिका क्षेत्रातील वनक्षेत्राचे, लोकांच्या सहभागातून आणि सक्रिय योगदानातून संयुक्तरित्या वन व्यवस्थापन केले जाईल. या कार्यक्रमांतर्गत राष्ट्रीय उद्यान/अभयारण्य वगळता सर्व प्रकारच्या वनांचा समावेश असेल.

२. स्थानिक नागरिक, स्थानिक स्वराज्य संस्था, स्वयंसेवी संस्था, स्वायत्त संस्था, अशासकीय संस्था आणि पर्यावरण तज्ञांच्या सहभागाने आणि सहकार्याने नागरी परिसरातील वनक्षेत्र आणि वनेत्तर पडिक क्षेत्रावरही वनोपजाच्या भागीदारीच्या तरतूदीविना सुधारीत रूपामध्ये या कार्यक्रमाची अंमलबजावणी करता येईल.

३. नागरी क्षेत्रात वन आणि वनेत्तर क्षेत्रावर परिसर विकासाची कामे करण्यासाठी उप वनसंरक्षकांच्या अध्यक्षतेखाली संयुक्त वन व्यवस्थापन (नागरी क्षेत्र) समितीची स्थापना करण्यात येईल. सदर समितीचे सभासद प्रत्येक लगतच्या वार्डातून २ पेक्षा जास्त राहणार नाहीत, अशा तऱ्हेने सदस्यांची संख्या व्यवस्थापनेच्या मर्यादेत ठेवण्यात येईल.

४. केंद्र शासनाने दि. ३१.५.२००२ रोजीच्या मार्गदर्शक सुचनान्वये संयुक्त वन व्यवस्थापन समितीचे गठण करण्याबाबत काही निर्देश दिले आहेत. केंद्र शासनाने सुचविल्याप्रमाणे व राज्यातील परिस्थिती विचारात घेवून संयुक्त वन व्यवस्थापन समितीचे गठण करण्यात येईल. यानुसार संयुक्त वनव्यवस्थापन समितीमध्ये खालीलप्रमाणे दोन समित्या असतील:-

१. सर्वसाधारण समिती
२. कार्यकारी समिती

**४.(१) नागरी क्षेत्राकरीता सर्वसाधारण समिती :-**

संयुक्त वन व्यवस्थापन (नागरी क्षेत्र) याकरीता मुंबई नागरी क्षेत्र अधिनियम,१९५९ प्रमाणे संबधित नागरी क्षेत्राच्या वॉर्डमधील सर्व इच्छुक प्रौढ सदस्य या सर्वसाधारण समितीचे सदस्य राहतील. वन विभागातंर्गत संबंधित अधिकाऱ्यांनी अशा वॉर्डमधील जास्तीत जास्त नागरीकांनी सर्व साधारण सभेमध्ये सदस्य म्हणून येण्यासदर्भात नोटीस बोर्डवर सूचना, हॅन्डबिल,पत्रके इत्यादी माध्यमांतून जन जागृती करण्यात यावी. सर्वसाधारण समितीचा कालावधी पाच वर्षांकरीता राहील. पाच वर्षानंतर समितीच्या सदस्यांची सर्वसाधारण समितीमध्ये काम करण्याबाबत इच्छुक असल्याची खात्री करावी. संबंधित क्षेत्रातील वन विभागाचे उप वनसरंक्षक हे सर्वसाधारण समितीचे अध्यक्ष राहतील.

**४ (२) नागरी क्षेत्राकरीता कार्यकारी समिती :-**

संयुक्त वन व्यवस्थापन (नागरी क्षेत्र) समितीच्या कार्यकारी समितीची रचना पुढीलप्रमाणे राहील.

| | | |
|---|---|---|
| १. | संबंधित क्षेत्राचे उपवनसंरक्षक. | - पदसिध्द अध्यक्ष |
| २. | संबधित वार्डाचे नगरसेवक . | - सदस्य |
| ३. | जिल्हाधिकारी /पोलीस उप आयुक्त ( शहर ) / जिल्हा पोलीस अधीक्षक यांचे प्रतिनिधी | - सदस्य |
| ४. | आयुक्त, महानगर पालिका यांच्या कार्यालयातील एक प्रतिनिधी | - सदस्य |
| ५. | संबंधित जिल्ह्याचे उपसंचालक, सामाजिक वनीकरण | - सदस्य |
| ६. | संबधित नगरपालिकेचे/महानगरपालिकेचे उद्यान अधीक्षक किंवा वृक्ष अधिकारी. | - सदस्य |
| ७. | मुख्याधिकारी, नगरपालिका/नगर परिषदा. | - सदस्य |
| ८. | या क्षेत्रामध्ये ज्यांची रुची/आवड आहे (Stake holder), अशापैकी दोन स्त्रिया. | - सदस्य |
| ९. | उपवनसंरक्षक यांनी निवड केलेल्या वन आणि पर्यावरण क्षेत्रात काम करणाऱ्या दोन स्वंयसेवी संस्थांचे प्रतिनिधी. | - सदस्य |
| १०. | लगतच्या प्रत्येक वार्डातून, या क्षेत्रामध्ये ज्यांची काही रुची/आवड आहे (Stake holder), अशापैकी उप वनसंरक्षक यांनी नामनिर्देशित केलेल्या दोन व्यक्ती. | - सदस्य |
| ११. | संबंधित वनक्षेत्रपाल | - सदस्य सचिव |

कार्यकारी समितीचा कालावधी पाच वर्षांकरीता राहील.

**५. संयुक्त वनव्यवस्थापन समितीची (नागरी क्षेत्र) नोंदणी :-**

संयुक्त वनव्यवस्थापन समितीची नोंदणी ही सुरवातीस समित्यांचे कामकाज तात्काळ सुरू व्हावे म्हणून उप वनसंरक्षक यांचेकडे करण्यात येईल व ते नोंदणी प्रमाणपत्र देतील. त्यांनतर सहा महिन्याच्या आत संयुक्त वन व्यवस्थापन समितीची संस्था नोंदणी अधिनियम,१८६० (Society Registration Act, १८६०) किंवा महाराष्ट्र विश्‍वस्त व्यवस्था अधिनियम,१९५० (Maharashtra Public Trust Act, १९५०) अंतर्गत करण्यात यावी.

**६. संयुक्त वन व्यवस्थापन (नागरी क्षेत्र) समितीचे बचत खाते (शासकीय खाते) :-**

नागरी क्षेत्राकरिता वन, वन्यजीव यांच्या संरक्षण, संवर्धन व व्यवस्थापनासाठी प्राप्त होणाऱ्या निधीच्या व्यवस्थापनेच्या उद्देशाकरिता राष्ट्रियीकृत/सहकारी बॅक किंवा पोस्ट ऑफिसमध्ये संयुक्त वन व्यवस्थापन (नागरी क्षेत्र) समितीच्या नावे बचत खाते उघडण्यात येईल. त्याचे संचालन कार्यकारी समितीचे सदस्य-सचिव हयांचेकडून करण्यात येईल. राज्य शासनाचा निधी, केंद्र शासनाकडून मिळणारा निधी, महानगरपालिका, जिल्हाधिकारी कार्यालय, नगरपालिका आणि इतर शासकीय स्त्रोताकडून प्राप्त होणारी रक्कम सदर खात्यात जमा केली जाईल आणि तिचा उपयोग मंजूर सूक्ष्म

योजनेनुसार (Micro Planning) विकास कामांसाठी केला जाईल. सदर बचत खात्यास शासकीय खाते असे म्हणता येईल.

७. इतर स्त्रोताकडून आणि संस्थेच्या स्वतःच्या उत्पन्नातून प्राप्त होणाऱ्या निधीच्या व्यवस्थापनाच्या उद्देशाकरिता राष्ट्रियीकृत / सहकारी बँक किंवा पोस्ट ऑफीसमध्ये स्वतंत्ररित्या दुसरे बचत खाते उघडण्यात येईल. सदर खात्याचे संचालन कार्यकारी समितीचे सदस्य-सचिव आणि कार्यकारी समितीमधील स्वयंसेवी संस्थेचे एक अशासकीय प्रतिनिधी (उपवनसंरक्षक यांनी निवडलेले) असे दोघेजण संयुक्तपणे करतील. सदर बचत खात्यास "संयुक्त वन व्यवस्थापन नागरी समिती खाते" असे म्हणता येईल. संयुक्त नागरी व्यवस्थापन समित्यांच्या बँक खात्यामध्ये, उद्योजकता सामाजिक दायित्व निधी (Corporate Social Responsibility ) याद्वारे विविध कंपन्यांकडून मिळणारा निधी ह्या बँक खात्यात जमा करता येईल. त्या निधीचा उपयोग वनाचे संरक्षण व संवर्धन करण्यासाठी कशाप्रकारे करावा, याबाबत उपवनसंरक्षक यांच्याशी संयुक्त वन व्यवस्थापन समिती सल्लामसलत करुन मंजूर सुक्ष्म आराखड्याप्रमाणे निधीच्या विनियोगाबाबत निर्णय घेईल.

८. संयुक्त वन व्यवस्थापन समितीचे "शासकीय खाते" आणि "नागरी समिती खाते" हयामधील रकमेच्या विनियोगाबाबत कार्यक्रम /योजनानिहाय आणि इतर खर्चासंदर्भातील, आधीच्या महिन्याचा सविस्तर अहवाल कार्यकारी समितीचे सदस्य-सचिव, हे सर्वसाधारण समिती आणि कार्यकारी समितीच्या अध्यक्षांना पुढील महिन्याच्या १० तारखेपर्यंत सादर करतील. सदर अहवालाचे अध्यक्षांकडून काटेकोरपणे तपासणी करण्यात येईल. काही उणिवा व त्रुटी आढळल्यास, त्या त्वरित दूर केल्या जातील. निधीचा योग्यप्रकारे विनियोग होण्यासाठी अध्यक्ष आणि सदस्य -सचिव यांची जबाबदारी राहील. या सदर्भात काही अनियमितता आढळून आल्यास संबंधित जबाबदार आधिकारी / अशासकीय सदस्य योग्य त्या कारवाईस पात्र राहतील.

९. **संयुक्त वन व्यवस्थापन समितीच्या बैठका :-**

संयुक्त वन व्यवस्थापन (नागरी क्षेत्र) समितीच्या वर्षातून कमीत कमी दोन वेळा सर्वसाधारण सभा आयोजीत करण्यात येतील. कार्यकारी मंडळाची बैठक किमान ३ महिन्यातून एकदा घेण्यात येईल. यासाठी सर्वसाधारण सभेतील सर्व सभासदांना ७ दिवसाची पूर्वसूचना देण्यात येईल. बैठकीच्या इतिवृत्तांत लगेचच विहीत नमुन्यात रजिस्टरमध्ये नोंद करून ठेवण्यात येईल आणि त्यावर अध्यक्ष तथा सदस्य सचिवांची स्वाक्षरी केली जाईल. संयुक्त वन व्यवस्थापन समितीची सर्वसाधारण आणि कार्यकारी समितीच्या सदस्यांची उपस्थिती प्रत्येक बैठकीच्या वेळी नोंदविली जाईल. महत्वाच्या धोरणात्मक बाबी व कार्यकारी समितीकडून केलेली कामे, याबाबत सर्वसाधारण सभेमध्ये चर्चा करण्यात येईल. सदर सभेचा इतिवृत्तांत संबंधित वनक्षेत्रपाल यांना पाठविण्यात येईल. संयुक्त वन व्यवस्थापन समितीतील सदस्यांसंबंधीची मूळ माहिती विहीत नमुन्यात ठेवण्याची जबाबदारी कार्यकारी समितीची राहील. सदर माहितीची नोंदणी पुस्तके सदस्य-सचिव यांचे कार्यालयात कायम स्वरुपी ठेवण्यात येतील.

संयुक्त वन व्यवस्थापन (नागरी क्षेत्र) सर्वसाधारण समितीच्या बैठकीची कार्यवाही सुरू करण्यासाठी एकूण सदस्य संख्येच्या १/३ संख्या इतकी आणि ५० टक्के स्त्री सदस्य असणे अपेक्षित राहील. तसेच कार्यकारी समितीच्या बैठकीचे कामकाज सुरू करण्यासाठी ६ सदस्य व त्यापैकी २ स्त्री

सदस्य उपस्थित असणे आवश्यक आहे. कार्यकारी समितीच्या बैठकीकरीता सभासदांना ३ दिवसाची पुर्वसूचना देण्यात येईल.

**१०. कार्यक्रमासाठी क्षेत्र निवडणे :-**

संयुक्त वन व्यवस्थापन (नागरी क्षेत्र) समितीच्या कामासाठी आवश्यक क्षेत्राची निवड उपवनसंरक्षक आणि कार्यकारी समितीतील इतर सदस्य यांचेमार्फत संयुक्तपणे करण्यात येईल. यासाठी वने आणि वनालगत किंवा इतर ठिकाणी असलेल्या सार्वजनिक पडीक जमिनी, दलदली किंवा पाण्याखालील जमिनी जेथे उपलब्ध असतील, अशा जमिनी सदर उद्देशासाठी निवडण्यात येतील. ह्या व्यतिरिक्त ह्याच भागात वृक्ष लागवडीसाठी इतरही काही जमिनी उपलब्ध झाल्यास त्या देखील निवडता येतील.

**११. सुक्ष्म योजना (Micro Plan) :-**

नागरी क्षेत्रासाठी संयुक्त वन व्यवस्थापन समितीकडून निवडलेल्या क्षेत्रासाठी सुक्ष्म योजना वन विभागाच्या संबंधित क्षेत्रिय अधिकाऱ्यांच्या सल्ल्यानुसार कार्यकारी समितीकडून तयार केली जाईल. त्यास कार्यकारी समितीची मंजुरी घेण्यात येईल. नंतर या योजनेस सर्वसाधारण समितीची मान्यता घेण्यात येईल आणि अशा मंजुरीनंतरच सदर योजना/कार्यक्रम यांची अंमलबजावणी करण्यात येईल.

सदर तयार केलेल्या सुक्ष्म योजनेच्या तरतुदीमध्ये वन संवर्धन अधिनियम तथा इतर वन कायद्यातील तरतुदींचे उल्लंघन होऊ नये, याबाबत खात्री केली जाईल.

**१२. संयुक्त वन व्यवस्थापन (नागरी क्षेत्र) सर्वसाधारण समितीतील सदस्यांची कर्तव्ये आणि जबाबदाऱ्या खालीलप्रमाणे राहतील :-**

**अ) संरक्षण** :- समितीच्या सभासदांमार्फत वनक्षेत्र व रोपवन क्षेत्राच्या संरक्षणासाठी व्यावहारिक कौशल्य असलेली पध्दत ठरविणे आणि महिन्यातून कमीत कमी एक दिवस पुनरूत्पत्ती व संवर्धनासाठी श्रमदान करणे व सदर क्षेत्रास नियमित भेटी देऊन बारकाईने लक्ष ठेवणे आवश्यक राहिल.

**ब) प्रतिबंध (Prohibition)** :- वनक्षेत्र व रोपवनक्षेत्रात अवैध वृक्षतोड, अतिक्रमण, आगी, अवैध चराई यापासून नुकसानीबाबत प्रतिबंधात्मक कार्यवाही करणे. ह्या संदर्भात गुन्हेगारांची नावे व तपशील वन अधिकाऱ्यास अवगत करणे, भारतीय वन अधिनियम, १९२७, वन्यजीव संरक्षण अधिनियम, १९७२, वनसंवर्धन अधिनियम, १९८० आणि वनाशी संबंधित इतर नियम व अधिनियमाप्रमाणे वनगुन्हयांचे कामी गुन्हेगारास अटक करण्यास, पकडण्यास व कायद्यांतर्गत गरज असेल, त्यावेळी सामाजिक बांधिलकी ठेऊन सक्षम कोर्टासमोर प्रकरण आल्यास तिथे उपस्थित राहून निर्भिडपणे साक्ष देणे. तसेच कायद्याप्रमाणे कार्यवाही करण्यासाठी वन अधिकाऱ्यांना सहाय्य करणे. त्याचप्रमाणे वनसंवर्धन व वन्यजीव व्यवस्थापनाच्या संदर्भात गुन्ह्यांचा प्रतिबंध, शोध तसेच नियंत्रणामध्ये वन अधिकाऱ्यांना मदत करणे.

**क) संयुक्त वन व्यवस्थापन** :- सुक्ष्म योजनेप्रमाणे निवडलेल्या क्षेत्राचे व्यवस्थापन करणे, वनविषयक कामे सुरळीतपणे व वक्तशीरपणे पार पाडण्यास वन अधिकाऱ्यांची मदत करणे. संबंधित वन अधिकाऱ्यास वनविषयक कामासाठी कामगार मिळविण्यास व वन व्यवस्थापन करण्याकामी त्यांना सहाय्य करणे आणि वन विभागाने नेमून दिलेली कामे करणे.

**ड) जन जागृती :-** जनतेमध्ये वन, वन्यजीवन, जैवविविधता, वृक्षाच्छादन वाढविणे आणि पर्यावरणाचे महत्त्व याविषयी जागृती निर्माण करणे. तसेच जागतिक तापमानातील बदल (Global Warming) व हवामानातील बदल (Climatic Change) यांची तीव्रता कमी करण्याच्या दृष्टीने जनतेमध्ये विचार मंथन घडवून आणणे आणि उपाययोजना सुचवून त्याप्रमाणे अंमलबजावणी करण्याचा प्रयत्न करणे.

**इ) वार्षिक लेखा परिक्षण :-** संयुक्त वन व्यवस्थापन समितीला प्राप्त झालेल्या तसेच खर्च केलेल्या रकमेबाबत, लेखा परिक्षण करून घेण्यासाठी सर्वसाधारण समितीच्या मान्यतेने लेखापरीक्षक नियुक्त करण्यात येईल. शासनाने वेळोवेळी पारीत केलेल्या नियमांना अनुसरून कार्यपध्दती अवलंबण्यात येईल. लेखापरिक्षकाच्या नियुक्तीबाबत, कार्यकारी समिती प्रस्ताव ठेवेल व सर्वसाधारण समिती मान्यता देईल.

**१३. कार्यकारी समितीची कर्तव्ये व जबाबदाऱ्या :-**

अ) संयुक्त वन व्यवस्थापन समितीच्या सर्व निर्णयाप्रमाणे व्यवस्थापनेसाठी आणि अंमलबजावणी करण्यासाठी कार्यकारी समिती जबाबदार राहील.

ब) समितीतील सदस्यत्व, वनसंरक्षण, मतभिन्नता झाल्यास त्याचे निराकरण आणि प्राप्त लाभांचे वितरण इत्यादी संबधित सर्व महत्वाच्या विषयावरील कार्यपध्दती संयुक्त वन व्यवस्थापन (नागरी क्षेत्र) सर्वसाधारण समितीच्या सल्ल्याने कार्यकारी समिती ठरविल.

क) शासनाकडुन प्राप्त होणाऱ्या निधीचे व इतर स्त्रोतांमधून मिळालेल्या निधीमधून वन विभागाच्या पध्दतीप्रमाणे लेखा व व्यवस्थापनेची जबाबदारी देखील कार्यकारी समितीची राहील.

**१४. संयुक्त वन व्यवस्थापन समिती आणि तिच्या सदस्यांना मिळणारे फायदे:-**

नागरी क्षेत्रामध्ये संयुक्त वन व्यवस्थापन समित्यांमार्फत जैवविविधतेसह उद्याने निर्माण झाल्यास त्या भागाचे निसर्ग सौंदर्य अधिक खुलविता येईल. त्यातून निसर्ग, वन्य आणि वन्यजीव,पर्यावरण प्रेमी अशा ठिकाणास भेटी देण्यास आकर्षित होतील. असे क्षेत्र पर्यटन क्षेत्र म्हणून नावारुपास येऊ शकते. याठिकाणी भेटी देणाऱ्या नागरिकांना प्रवेश फी आकारता येईल. प्रवेश फीचा दर किती असावा, हे सर्वसाधारण समिती (नागरी क्षेत्र) ठरवेल. सदर उत्पन्न संयुक्त वन व्यवस्थापन समितीच्या नागरी खात्यामध्ये जमा होईल. उद्यानांची व पर्यटन स्थळांची दैनंदिन देखभाल आणि निगा राखण्यासाठी अशा रक्कमेचा विनियोग करण्याबाबत संयुक्त वन व्यवस्थापन समिती निर्णय घेऊ शकेल.

नागरी क्षेत्रातील दोन्ही समितीच्या सदस्यांनी किंवा नागरिकांनी त्यांच्या क्षेत्रात घडलेल्या वन गुन्हेगारांना पोलिसांकडे किंवा वन अधिकाऱ्यांकडे पकडून देण्यासाठी सहकार्य देणे आवश्यक आहे. तसेच अशा वन गुन्हेगारांविरुध्द पुढील कार्यवाहीसाठी सक्षम न्यायालयात गुन्हा दाखल झाल्यानंतर, न्यायालयामध्ये निर्भिडपणे साक्ष देणे आणि संबंधित गुन्हेगारास न्यायालयाकडून शिक्षा होण्यासाठी शासकीय यंत्रणेस मदत करणे हे समितीचे सदस्य आणि नागरिक यांच्याकडून अपेक्षित आहे. अशा प्रकरणात गुन्हेगारांकडून प्राप्त झालेली नुकसान भरपाई/अर्थ दंडाची ५०% पर्यंत रक्कम प्रोत्साहन म्हणून संबंधित वन व्यवस्थापन समितीला दिली जाईल. तसेच गुन्हेगारांकडून अर्थ दंडाच्या वसुलीसाठी समितीतील ज्या सभासदांनी/नागरिकांनी प्रत्यक्ष भाग घेतला असेल, अशा सभासदांना किंवा नागरिकांना संयुक्त वन व्यवस्थापन समितीमार्फत बक्षिस देण्यास ते पात्र राहतील.

**१५. सदस्यत्वाची बरखास्ती, समितीची मान्यता काढणे आणि अपील इत्यादी :-**

**अ) संयुक्त वन व्यवस्थापन समितीची/सदस्यांची मान्यता रद्द करणे :-** संयुक्त वन व्यवस्थापन समिती/कार्यकारी समितीच्या सदस्याने वनविषयक अधिनियम, नियम व अन्य तरतुदींचे उल्लंघन केले असेल तर, ही समिती बरखास्त करण्याचे किंवा समितीच्या सदस्यांचे, सदस्यत्व रद्द करण्याचे अधिकार संबंधित मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक) यांना राहील. परंतु, समिती बरखास्त करताना किंवा एखाद्याचे सदस्यत्व रद्द करताना नैसर्गिक तत्त्वाचे पालन करण्यात यावे. तसेच अशा समिती किंवा सदस्याला वनोपजाचे कोणतेही फायदे मिळू नयेत, याची दक्षता घेतली जाईल.

**ब) अपील :-** समित्या/सदस्यांची, सदस्यत्व भंग झाल्यानंतर एक महिन्याच्या आत समिती/सदस्य अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) यांच्याकडे अपील करु शकतील. त्यांचा निर्णय अंतिम राहील.

**क) वाद मिटविणे -** संयुक्त वन व्यवस्थापन समितीच्या सदर शासन निर्णयान्वये अंमलबजावणी करताना कोणत्याही प्रकारचा वाद निर्माण झाल्यास त्याबाबतचा निर्णय संबंधित मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक) घेतील व तो अंतिम राहील.

**१६. संयुक्त वन व्यवस्थापन कार्यक्रमाच्या अंमलबजावणीतील निरीक्षण व मार्गदर्शनाकरिता राज्यस्तरीय सुकाणू समिती.**

संयुक्त वन व्यवस्थापन कार्यक्रमाच्या अंमलबजावणी करताना उद्भवणारे प्रश्न सोडविण्यासाठी व संयुक्त वन व्यवस्थापन समित्या सुरळीतपणे काम करतील यांची खात्री करण्यासाठी प्रधान मुख्य वनसंरक्षक, महाराष्ट्र राज्य, वनभवन, नागपूर यांच्या अध्यक्षतेखाली पुढे नमुद केल्याप्रमाणे राज्यस्तरीय सुकाणू समिती गठीत करण्यात येत आहे :-

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर. - अध्यक्ष
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक व महासंचालक, सामाजिक वनीकरण, पुणे. - सदस्य
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (उत्पादन व व्यवस्थापन), महाराष्ट्र राज्य, नागपूर. - सदस्य
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर. - सदस्य
५. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संरक्षण), महाराष्ट्र राज्य, नागपूर. - सदस्य
६. संचालक (नगर प्रशासन) किंवा त्यांचा प्रतिनिधी. - सदस्य
७. उप सचिव /सह सचिव (वन विभाग)- कामकाजाशी संबंधित. - सदस्य
८. मुख्य वनसंरक्षक (संयुक्त वन व्यवस्थापन, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य,नागपूर. - सदस्य-सचिव

सदर शासन निर्णय, नगर विकास विभाग यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.५५/नवि-२०, दि.०४.०८.२०१५ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०८०४१८१९२०४५१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

Dattatraye Laxman Thorat

Digitally signed by Dattatraye Laxman Thorat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Dattatraye Laxman Thorat
Date: 2015.08.04 18:24:25 +05'30'

**( डी.एल. थोरात )**
**सह सचिव (वने)**

**प्रतिलिपी :-**

1) मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
2) मा. मुख्य मंत्र्यांचे प्रधान सचिव
3) सर्व अपर मुख्य सचिव /प्रधान सचिव/सचिव
4) प्रधान सचिव (नवि-१), सचिव (नगर विकास-२)
5) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
6) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) महाराष्ट्र राज्य, नागपूर
7) प्रधान मुख्य वनसंरक्षक (उत्पादन व व्यवस्थापन) महाराष्ट्र राज्य, नागपूर
8) व्यवस्थापकीय संचालक, वन विकास महामंडळ मर्या' कडबी चौक, नागपूर
9) प्रधान मुख्य वनसंरक्षक व महासंचालक, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे
10) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (सर्व)
11) सर्व मुख्य वनसंरक्षक/वनसंरक्षक/उपवनसंरक्षक
12) महालेखापाल-१/२(लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
13) सर्व विभागीय आयुक्त
14) जिल्हाधिकारी (सर्व)
15) आयुक्त, महानगर पालिका (सर्व)
16) आयुक्त तथा संचालक, नगर परिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई.
17) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हापरिषद (सर्व)
18) मुख्याधिकारी, नगरपालिका/ नगर परिषद (सर्व)
19) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
20) सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
21) प्रकल्प अधिकारी, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा (सर्व)
22) जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी (सर्व)
23) कृषी विकास अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
24) जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी (सर्व),
25) जिल्हा आदिवासी कल्याण अधिकारी (सर्व),
26) जिल्हा उदयोग अधिकारी (सर्व)
27) जिल्हा सार्वजनिक आरोग्य अधिकारी (सर्व)
28) सर्व कार्यासन, महसूल व वन विभाग (वनकक्ष)
29) निवडनस्ती, फ-२ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई.